**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-“अ” या संवर्गातील अधिकाऱ्यांना अपर संचालक, गट-“अ” या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांक: पदोनि-११२०/प्र.क्र.२३/का.१४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ ऑगस्ट, २०२०.

## शासन आदेश

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-“अ” संवर्गातील श्री.वा.ब.काळे, सहसंचालक (प्रशिक्षण) व डॉ.जि.व. चौधरी (समन्वय), सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय यांना अपर संचालक, गट-“अ”, अर्थ व सांख्यिकी संचालनालय या संवर्गातील सुधारीत वेतन मॅट्रिक्समधील वेतन स्तर (S-२५: ७८,८००-२,०९,२००) पदावर खालील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून, या आदेशाच्या दिनांकापासून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. सदरहु पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव व प्रवर्ग | सध्याचे पदनाम व कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नांव | पदोन्नतीनंतरची पदस्थापना करण्यात आलेले पद. |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १ | श्री.वा.ब.काळे (खुला) | सहसंचालक (प्रशिक्षण), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई | अपर संचालक (इआसकें), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई (रिक्त पद) |
| २ | डॉ.जि.व. चौधरी (खुला) | सहसंचालक (समन्वय), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई | अपर संचालक (मूल्यमापन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई (श्री.वि.कृ.आहेर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |

२. सदर पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर आदेशानुसार पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे. तसेच त्याची एक प्रत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची नसल्यास त्याबाबत लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

२) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ४/८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या

विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय विधि व न्याय विभागाने दिनांक २८/१२/२०१७ रोजी दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमध्ये मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दिनांक २५/५/२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.१६-ब यांनी दिनांक २९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत. त्यानुसार श्री.वा.ब.काळे, सहसंचालक व डॉ.जि.व. चौधरी, सहसंचालक यांची अपर संचालक पदावरील तात्पुरती पदोन्नती मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अधीन असून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे.

३) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४) पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्यानंतर श्री.वा.ब.काळे, सहसंचालक व डॉ.जि.व. चौधरी, सहसंचालक यांनी ७ दिवसांच्या आत त्यांचे ई-प्रोफाईल सुधारित करुन त्याची प्रत शासनास तसेच अर्थ व सांख्यिकी संचालनालयास सादर करावी. प्रत सादर न केल्यास त्यांचे चालू महिन्याचे वेतन अदा केले जाणार नाही.

५) या पदोन्नतीने श्री.वा.ब.काळे, सहसंचालक व डॉ.जि.व. चौधरी, सहसंचालक यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०२००८१७१७२१०२८०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

PRADNYA MAHALE

Digitally signed by PRADNYA MAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f0b9244e8f45f12e0a399cd036d6d3767c67c8349951e3e5047b7469a24cdfb2, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRADNYA MAHALE
Date: 2020.08.18 12:02:27 +05'30'

**( प्रज्ञा महाले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई,

२. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई,
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४. मा.उप मुख्यमंत्री (नियोजन)/मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
५. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र राज्य विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (*पत्राने)
७. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
८. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/१३/१६-ब), मंत्रालय, मुंबई.
९. सर्व सह सचिव/ उप सचिव/ विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व सह संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
११. सर्व उप आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
१२. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. श्री.वा.ब.काळे (प्रशिक्षण), सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई
१६. डॉ.जि.व.चौधरी (समन्वय), सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई
१७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती.